**युनिक आयडेन्टिटी प्राधिकरणामार्फत राबविल्या जाणाऱ्या प्रकल्पावर देखरेख करण्यासाठी मा.मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती स्थापन करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रमांकः मातंसं/नस्ती-२०१०/प्र.क्र.४८/३९,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः १७ एप्रिल, २०१०

वाचाः- सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र.४८/३९, दिनांकः ३ एप्रिल, २०१०

**शासन निर्णयः-**

केंद्र सरकारने नियोजन आयोगाच्या अधिपत्याखाली भारतीय नागरिकांना ओळख क्रमांक देण्यासाठी युनिक आयडेन्टिटी ऑथॉरिटी या प्राधिकरणाची स्थापना केली आहे. प्राधिकरणामार्फत राबविल्या जाणाऱ्या प्रकल्पाची राज्यात प्रभावी अंमलबजावणी व्हावी म्हणून या प्रकल्पावर देखरेख करण्यासाठी मा.मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उच्चाधिकार उपसमिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मा. मुख्यमंत्री | - | अध्यक्ष |
| २) | मा. उपमुख्यमंत्री | - | उपाध्यक्ष |
| ३) | मा. मंत्री (महसूल) | - | सदस्य |
| ४) | मा. मंत्री (वित्त व नियोजन) | - | सदस्य |
| ५) | ज्या विभागाचे वेळोवेळी UID संबंधीचे काम उद्भवणार असेल त्या विभागाचे मा.मंत्री | - | सदस्य |
| ६) | प्रधान सचिव (मा.तं.) | - | सचिव व निमंत्रक |

सदरच्या शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक २०१००४१७१९५६३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(डॉ.अजय भूषण पांडेय )**
**प्रधान सचिव (मा.तं.)**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७. श्री. आर. एस. शर्मा, महासंचालक, युनिक आयडेन्टिटी प्राधिकरण, नियोजन आयोग, टॉवर II, ३रा मजला, जीवन भारती, कॅनॉट सर्कल, नवी दिल्ली ११०००१
८. संचालक (मा.तं.), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (मा.तं.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती.